(२३४)

2015092312083091227 ~~2015092312025024527~~

बलठण ल.पा. योजना ता.अकोले,
जि.अहमदनगर व्दितीय सुधारित
प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्रमांक :- लपायो २००८/१२७२/(४४५/२००८) खारभूमी
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :-१२/१२/२००८

पहावे :- १) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे पत्र क्रमांक गोमपाविम/ता-५/बलठण लपा/३२५२/०६

२) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे पत्र क्रमांक लाक्षेविप्रा/प्रशा-४/विसुप्रमा/बलठण/७१७९/२००८, दिनांक २८.८.२००८

प्रस्तावना :-

बलठण ल.पा. योजना, ता.अकोले, जि.अहमदनगर या योजनेस शासन निर्णय क्रमांक लपात-२७९२/१/४२१/९२/खारभूमी, दिनांक १४.१.१९९४ अन्वये रुपये ४४२.६२ लक्ष रक्कमेस मूळ प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तसेच शासन निर्णय क्रमांक लपात-२०००/(१६५/२०००)/खारभूमी, दिनांक १९.१.२००१ अन्वये रुपये ९२३.५७ लक्ष किंमतीस प्रथम सुधारित प्रशासकिय मान्यता प्राप्त झाली. सदर योजनेचे काम सन १९९४-९५ मध्ये सुरु करण्यात आले. जानेवारी २००० पासून धरणाची उर्वरित कामे ब-१ निविदेवर करण्यात आली. योजनेची जवळपास ८०% कामे पूर्ण झालेली आहेत. दरसूचीतील दरवाढ, भूसंपादनाच्या किंमतीत झालेली वाढ, कामाच्या परिणामातील वाढ इत्यादी कारणांमुळे झालेली वाढ विचारात घेऊन कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांच्याकडून रुपये १४११.५३ लक्ष किमतीचा व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रस्ताव शासनास प्राप्त झाला. व शासन निर्णय दिनांक २०.८.२००८ प्रमाणे योजनेची किंमत रु.१२४४.७९ लक्ष असून तो शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय

आता या शासन निर्णयान्वये बलठण ल.पा.यो, ता.अकोले, जि.अहमदनगर या योजनेस सन २००७-२००८ वर्षाच्या दरसुचीवर आधारित सुधारित केलेल्या प्राक्कलनानुसार कामाच्या एकूण अंदाजित रूपये १२,४४,७९,१७७/- (रूपये बारा कोटी, चव्वेचाळीस लक्ष, एकोणऐंशी हजार एकशे सत्याहत्तर फक्त) यापैकी कामाप्रित्यर्थ रूपये ११,३५,४५,२९४/- व रूपये १,०९,३३,८८३/- अनुषंगिक खर्च या रक्कमेस व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. उपशिर्षवार तरतूदीचा गोषवारा सोबत परिशिष्टामध्ये देण्यात आलेला आहे.

या योजनेच्या कामावरील खर्च मागणी मुख्य लेखाशिर्ष "४७०२ लहान पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च ८००-इतर खर्च योजना पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका(४) महाराष्ट्र गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ भाग भांडवली चालू आर्थिक वर्षात अंशदान योजनांतर्गत(संगणक सांकेतांक क्र. ४७०२/४९९-२) " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व महाराष्ट्र गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळाकडे उपलब्ध होणाऱ्या तरतूदीतून परस्पर भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय क्रमांक संकिर्ण १०९९/(१२९/९९) मोप्र (प्र) दिनांक १८/५/१९९९ मधील तरतूदीनुसार आतंर वित्त सल्लागार व उप सचिव यांच्या सहमतीने प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली सुधारित प्रशासकीय मान्यता (४६/२००८) अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(रा.च हुमणे)
शासनाचे अवर सचिव

प्रति,

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई/नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा) मुंबई / नागपूर
वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग (१४६१), मंत्रालय, मुंबई
कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक.
आतंर वित्त सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उप सचिव (लपा) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, अहमदनगर
अवर सचिव (खारभूमी), जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
उप सचिव (खारभूमी), जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग क्र.२, संगमनेर
अर्थ शाखा ५ /२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
लपा-१ (२ प्रती) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी, अहमदनगर.
विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालक, मंत्रालय, मुंबई (२ प्रती)
संगणक कक्ष, मंत्रालय, मुंबई
खारभूमी कार्यासन संग्रहार्थ.

F:\kharbhumi\Humane\BALTHAN.doc

शासन निर्णय क्रमांक लपायो २००८/१२७२/(४४५/२००८) खारभूमी दि.१२/१२/२००८ चे परिशिष्ट

## बलठण लघु पाटबंधारे योजना, ता.अकोले, जि.अहमदनगर अंदाजपत्रकाचा गोषवारा

| क्रमांक | शिर्ष / उपशिर्ष | रक्कम (रुपये लक्ष) | एकुण रुपयात |
|---|---|---|---|
| | | शिर्षकामे | |
| १ | "ए" प्राथमिक | ३४९१५८ | ३४९१५८ |
| २ | "बी" (भूसंपादने) | ४२०६४६६ | ४२०६४६६ |
| ३ | "सी" मुख्य कामे | ९७८६६९४१ | ९७८६६९४१ |
| ४ | "डी" विमोचक | ५२३३९४०९ | ५२३३९४०९ |
| ५ | "के" इमारती | ५९३२८८ | ५९३२८८ |
| ६ | "एम" वृक्षरोपन | --- | --- |
| ७ | "ओ" संकीर्ण | ३९८८४२ | ३९८८४२ |
| ८ | "पी" देखभाल | ८८१५१० | ८८१५१० |
| ९ | "आर" दळणवळण | ३०१५१४० | ३०१५१४० |
| | वितरिका | १०००००० | १०००००० |
| | कामाप्रित्यर्थ किमत | ११३५४५२९४ | ११३५४५२९४ |
| | अनुषांगिक खर्च (१० टक्के भूसंपादन वगळून) | १०९३३८८३ | १०९३३८८३ |
| | योजनेची एकूण किमत | १२४४७९१७७ | १२४४७९१७७ |

### ठळक वैशिष्टये

| | |
|---|---|
| योजनेची सिंचन क्षमता | १०७४ हेक्टर |
| नियोजित पाणीसाठा | ५७२५ स.घ.मी. |
| पाणी साठ्याची प्र.स.घ.मी. किंमत (रु) | २१७४३ < २९०२३ (आर्थिक मापदंड बसते) |
| लाभव्यय गुणोत्तर | १.७३ > १.०० (आर्थिक मापदंडात बसते) |